# नेटाक्षरी

ई-साहित्य प्रतिष्ठान
दिनांक २७ सप्टेंबर २०१०
वर्ष दुसरे, अंक २८

ते रंग नवे
ते शब्द नवे
नवलाई नाविन्याची....
ते भाव नवे
ते बंध नवे
नवनवेली 'नेटाक्षरी' त्यांची....



संपादिका
भारती सरमळकर (मुंबई)

अतिथी संपादक
सचिन पावसकर (मुंबई)

सह संपादक
सोनाली घाटपांडे (पुणे)
स्वप्ना कोल्हे (नाशिक)
सचिन काकडे (मुंबई)

# अतिथी संपादकाची ओळख

काही दिवसांपुर्वी काव्यांजलीवर एक नवीन धागा दिसला...... "त्रिवेण्या -सचिनच्या" मग "कुप्पी", "मुक्त प्राक्तन", "जरा मन मोकळे करायचेय" ह्या त्याच्या कविता वाचल्या.... "साजणे" हि गज़ल सुद्धा वाचली.... वेगवेगळे विषय हाताळायची कला, सुंदर, साधं आणि थेट लिखाण ह्या त्याच्या लिखाणाच्या खुबी.....नवनवीन लिहायचा उत्साह त्याच्या लिखाणातून अगदी भरभरुन दिसत असतो....

"INTERNATIONAL BUSINESS MANAGEMENT" चा अभ्यासक्रम पुर्ण केलेला नवी मुंबईचा हा अतिशय उत्साही, विविध प्रकारचे सुंदर लिखाण करणारा IMPORT-EXPORT MANAGER - **सचिन पावसकर** आज नेटाक्षरीला ***अतिथी संपादक*** म्हणून लाभला आहे....

"नेटाक्षरी"च्या कुटुंबात सचिनचे मनापासून स्वागत आणि पुढील यशस्वी काव्यमय प्रवासाकरीता खुप खुप शुभेच्छा !!!

**भारती सरमळकर**

संपादिका - मुंबई

email : bharatisarmalkar@gmail.com



# अतिथी संपादकाच्या लेखणीतून...

प्रिय काव्यप्रेमी मित्रांनो.....
सस्नेह नमस्कार,

मी सचिन.... सचिन पावसकर
नवी मुंबईतून. एक सर्वसाधारण मराठी कुटुंबातून आलेला. व्यवसायाने "आंतरराष्ट्रीय खरेदी-विक्री (आयात-निर्यात) निबंधक" किंवा समजायला सोप्या भाषेत "INTERNATIONAL MARKETING (IMPORT-EXPORT) MANAGER" आहे (हल्ली इंग्रजी जास्त लवकर समजते ना.) वाणिज्य शाखेतून पदवी अभ्यासक्रम पुर्ण केल्यानंतर नोकरी करता करता "INTERNATIONAL BUSINESS MANAGEMENT" चा अभ्यासक्रम पुर्ण केला. आता हे सगळं करताना "कविता" हा विषय कसा काय आला हा प्रश्न येतो. त्याचं उत्तर एकचं, "उपजत". नक्की कधीपासून कविता करतो हे सांगणं कठीण आहे, पण शाळेत असताना पासून लिखाणाची आवड होती. कविता लेखन, निबंध लेखन, अशा स्पर्धांमध्ये भाग घेत असे, त्यानंतर कालेजमध्ये असताना कविता करत असे. परंतु जेवढ्याही कविता लिहिल्या होत्या त्या माझ्यापुरत्याच मर्यादित राहिल्या, माझ्याच वहीमध्ये. कधी कुठे पोस्ट केल्या नाहीत किंवा ई-मेल वगैरे केल्या नाहीत. जुन्या घरातून नवीन घरी येताना ती वही हरवली आणि कवितेशी नाळ तुटल्यासारखं झालं. मधला बराच काळ काहीच लिहिलं नाही. पुन्हा सुरुवात केली ती दिड-दोन वर्षांपुर्वीपासून. संगणकाचा परिपूर्ण वापर करत सगळ्या कविता जपून ठेवल्या ह्या वेळेला, पण पुन्हा तेच, काव्यांजलीवर येण्या अगोदपर्यंत त्या माझ्यापुरत्या मर्यादित होत्या.

सचिन पावसकर

अतिथी संपादक
मुंबई

ह्यावरुन आठवलं. माझी अजुन एक ऒळख आहे. ती म्हणजे, काव्यांजली कुटुंबाचा एक सद्स्य (नवीन). नवीन ठळकपणे एवढ्यासाठीच म्हणतोय कारण "नेटाक्षरी" च्या आजच्या अंकाची मूळ संकल्पनाच आहे "नवीन कवी आणि त्यांच्या कविता"

"काव्यांजली" वर कसा आलो, कविता, त्रिवेण्या कशा पोस्ट करायला लागलॊ ही पण एक कहाणीच आहे. "ऒर्कुट" म्हणजे नवीन-जुने मित्र शॊधण्याचं, त्यांना SCRAP करुन संवाद साधण्याचं ठिकाण, एवढिच काय ती ऒर्कुट्ची मला ऒळख. त्याउपर इथे वेगवेगळया कम्युनिटिज असतात, तिथे अशाप्रकारे आपण काही पोस्ट करु शकतॊ ह्याची कल्पनाही मला नव्हती. पण एकदा "त्रिवेण्या-मकरंदच्या" हे ई-साहित्य प्रतिष्ठानचे ई-बुक मला एका फ़ॊरवर्ड ई-मेल मधून आलं आणि तिथेच सगळं बदललं. त्यामध्ये मकरंद्चा ईमेल आयडी होता ज्यामुळे मी मकरंद्च्या संपर्कात आलो. पुढे मकरंदनेच मला काव्यांजलीचा रस्ता दाखवला. त्याच्या त्रिवेण्या मनापासून आवडल्या आणि त्या वाचून वाचूनच मला त्रिवेण्या लिहिण्याची सवय आणि आवड लागली. पुढे माझ्या त्रिवेण्यांचा स्वतंत्र धागा तयार केला आणि काव्यांजली वर जणू माझी एक ऒळखच निर्माण झाली. सचिन? त्रिवेणी का? अशा पद्धतीने मला बरेच लोक ऒळखू लागले आणि माझ्यासाठी हा एक सुखद अनुभव होता. त्या सोबतच मग जुन्या नविन कविताही पोस्ट केल्या.

अलिकडे गझल लिहिण्याचाही प्रयत्न केला आणि सगळयाच पोस्ट्ना भरभरुन प्रतिसाद मिळाला.

सचिन पावसकर
अतिथी संपादक
मुंबई

**ई-साहित्य प्रतिष्ठानचा** एक प्रशंसनीय आविष्कार म्हणजे **"नेटाक्षरी"** ई-साप्ताहिक. दरवेळेला वेगवेगळया संकल्पना घेऊन दर्जेदार, मजेदार साप्ताहिक जागतिक स्तरावर जवळपास साठ ते सत्तर हजार लोकापर्यंत इंटरनेट्च्या माध्यमातून पोहचवायचं हे खरचं प्रशंसनीय काम आहे. त्याचाच परिणाम म्हणा की उत्तरोत्तर **"नेटाक्षरी"** ची लोकप्रियता, प्रसिद्धी वाढते आहे. नव्या जुन्या कवींच्या उत्तमोत्तम आणि संकल्पनेला साजेश्या कविता, सुंदर आणि आकर्षक मांडणी, उत्तम सादरीकरण अशा अनेक कारणांमुळे एखाद्या व्यावसायिक साप्ताहिकाला लाजवेल असा अंक असतो **"नेटाक्षरी"**चा.

**"नेटाक्षरी"** मध्ये इतक्या वेगवेगळया संकल्पना वापरल्या गेल्या आहेत की ज्या खरोखरच कौतुकास्पद आहेत आणि त्या अगदी सहज आणि मनोरंजनात्मक पद्धतीने यशस्वीपणे साकारल्या गेल्या आहेत. त्या योगाने नवीन कवींना आपल्या कविता प्रसिद्ध करण्यासाठी एक हक्काचं पान मिळालयं.
आजच्या ह्या खास अंकामुळे आम्हा नवीन कवींमध्ये आत्मविश्वासाची, उत्साहाची एक लाट उसळली आहे. जिचा परिणाम येणा-या काळात जास्तीत जास्त नवीन आणि दर्जेदार कवितांवरुन दिसुन येईल.

मला अतिथी संपादकाचे स्थान, खरंतर "मान"दिल्याबद्दल मी **नेटाक्षरीचा** मनःपुर्वक आभारी आहे. त्यांच्याच परवानगीने सादर करतो नवीन कवींच्या कवितांचा हा नजराणा.

**सचिन पावसकर**

अतिथी संपादक - मुंबई

संपर्क - ९९३०२६०२८०

email : skpawaskar@gmail.com

सचिन पावसकर

अतिथी संपादक
मुंबई

# --- कुप्पी ---

कस्तुरी दरवळते बघ घरभर,
अचानक कुप्पी उघडल्यावर,
तसच काहीतरी जाणवतयं,
आज तुला भेटल्यावर,

नाही, तू कस्तुरी नाहीस माहीत आहे मला,
आणि तो दरवळणारा सुगंधही नाही मी म्हणत तुला,
पण ती 'कुप्पी' मात्र तू नक्कीच आहेस,
जी उघडली माझ्यासमोर आणि दरवळले आयुष्य माझं,

दरवळले आयुष्य माझं, त्या लपलेल्या भावनेने,
त्या आसक्त इच्छेने त्या अनपेक्षित प्रेमाने,
आपलेपणाने, जो तू अगदी आत्मियतेने दिला,
आणि त्या आत्मियतेने, जी तू अगदी आपलेपणाने दिली,

संपूर्ण होतं आयुष्य हे मत माझं,
माझ्याच आयुष्याबद्दल,
तुझ्या येण्याने ह्या आयुष्यात,
कळलं, एक भास होता तो निव्वळ,

अपेक्षा करुन अपेक्षाभंगाचे दुःख मिळतं
म्हणून अनपेक्षित आयुष्य जगलो आजवर,
आनंद आहे, आज तुझं तसचं अनपेक्षित प्रेम मिळवून,
बस्स, असचं प्रेम करत रहा माझ्यावर

**सचिन पावसकर**
अतिथी संपादक - मुंबई

# --- कोंडमारा ---

काप-या शब्दात माझ्या
अंतरीचा दाह होता
कोंडलेल्या भावनेचा
खोल, गहिरा घाव होता

पाश होते पाकळयांचे
अत्तराचे घाव होते
त्या नशील्या काळजाचे
तेच फ़सवे वार होते

शब्द सारे मूक झाले
भाव नयनी दाटलेले
व्यक्त करण्यापलीकडले
अव्यक्त नाते जन्मलेले

तु तुझी न राहिलीस
माझा मी न राहिलो
खोल डोहाच्या तळाशी
मी कोरडाच राहिलो

उसळत आवेग माझा
मी गिळुनी टाकलेला
अन, तुझा तो कोंडमारा
बर्फ़ होऊनी गोठलेला

पोर्णिमेच्या रात्रीलाही
ग्रहण होते लागलेले
तू स्वतःला दिलेस झोकुन
हात माझे बांधलेले

संचिता कारखानीस

# --- सांत्वन ---

काल माझ्या सांत्वनाला कोण तो येवून गेला
एक माझा हुंदका रे. . एक तो देऊन गेला. . !!

हा कुणाचा हात आणि ही कुणाची आसवे रे
हाक मारु मी कशी. . आवाजही घेउन गेला. . !!

का घरे वाहुन गेली कालच्या त्या पावसाने
का नदिचा काठ माझा कोरडा ठेउन गेला. . !!

पांगळी माझी व्यथा का आंधळ्या गावास सांगु?
मी न केली आर्जवे तो का पुन्हा येवून गेला. . !!

सावळी माझी कहाणी , सावळा माझा मुरारी
सावळेसे सूर माझे सावळा घेऊन गेला. . !!

**ममता रियाज**

# --- सुटका ---

गर्र चाक फ़िरलं
रहाट गडगडलं
उफ़्फ़ दोर निसटला
घागर कलंडली
तळाशी बुडाली
तळ गाठुन
पुन्हाशी वर आली
कलई काळवंडली
पोच गेला

जगण्याला कसला तडा गेला
अन, मरणाचा घडा अर्धाच भरला
गळकी घागर
गोल विहिरीत फ़िरते आहे
बुलंद भिंतीस धडकते आहे
गळक्या छिद्रातुनच तरंगते आहे

कधी डोळे मिचकावून
आकाशाकडे एकटक पाहते आहे
कधी डोळे गच्च मिटुन
खोल पाण्यात रमते आहे

नक्कि काय हवे आहे तिला
जगणं कि मरणं ?
जगण्याची मुक्तता
कि मरणाची अधीरता
आकाशाची उंची
कि गर्भ जमिनीची खोली
का तिला हवी आहे
फ़क्त सुटका ???

कविता अशोक मोकाशी

# --- भिंतीवरला फोटो ---

थकल्या देहाला देत आधार काठीचा
लटपटत्या पायांनी तुझा कानोसा घेतला
शोधीत असाच मग घरभर तुला
भिंतीवरल्या फोटोने सगळा खुलासा केला

नजरे समोरच होती
तुझी फ्रेम लटकलेली
किलकिल्या डोळ्यांनी
मी ती रोज पाहिलेली
जवळ जाता अधिक
काचेवर त्या
माझ्यात तू
अगदी सहज मिसळलेली

थरथरत्या हातांनी मग मी स्पर्शिता तुला
हळूच तू लाजल्याचा तेव्हा भास मला झाला
शोधीत असाच मग घरभर तुला
भिंतीवरल्या फोटोने खुलासा केला

माझ्या आवडीचा फोटो हा
त्या जुन्या अल्बम मधला
बघताना तू तेव्हा
एक शब्द टाकलेला
“जाईन मी जेव्हा
या जगातून कायमची
अशीच राहून समोर
तुला पहायचेय मला”

भरल्या डोळ्यांनी मग मी पाहता तुला
उमाळयाचा तुझ्या तेव्हा भास मला झाला
शोधीत असाच मग घरभर तुला
भिंतीवरल्या फोटोने खुलासा केला

बाहेरचा वारा
नंतर घरात शिरलेला
शिरताना फ्रेमवरला
चंदनाचा हार हललेला
तू आल्याची जणू
तेव्हा चाहूल झाली
अन चंदनालाही
तुझा गंध खास आला

दंगल्या मनानी मग मी आठवित तुला
तू असल्याचा तेव्हा भास मला झाला
शोधीत असाच मग घरभर तुला
भिंतीवरल्या फोटोने खुलासा केला

**रुपेश सावंत**

# --- सखे तू ---

सांभाळ हा भार सखे
हृदयावर वार सखे. . . !!

नजरेचे मदन बाण
झाले आर पार सखे. . . !!

केतकीचा रंग गोरा
रंगलो मी फ़ार सखे. . . !!

कोकिळेचा सुर ओठी
झंकारली तार सखे. . . !!

गंधाळले श्वास तुझे
मानली मी हार सखे. . . !!

चांदण्यांची साथ तुझी
झालो मी गार सखे. . . !!

लावण्याची खाण सखे तू. . . !!
या नराची नार सखे तू. . . !!

मनीषा (माऊ)

# --- अजूनही ---

आकाशाला गवसणी
घालायला निघालेला तू
तुझ्या मागे
वाढत चाललेला
माणसांचा लोंढा
मी कधीच
मागे पडले
आपल्यातले अंतर
वाढतच चाललेय
पण
तुझे हसू
तुझा आवाज
अजूनही वेड लावतात
अन तुझे
काहीच शब्द
क्षणात आपल्यातले
अंतर मिटून टाकतात
माझ्यासाठी जणू
अमताचे थेंब असतात
जे आपल्यातल्या नात्याची वीण
एक अदृश्य धाग्याप्रमाणे
घट्ट विणतात
दुरुन तुला बघून सुद्धा
भरुन पावतात
तुझ्या अस्तित्वाच्या जादून
कायम भारलेली असते मी
अजूनही.....
आणि तू न मानणा-या
देवाजवळ तुझ्यासाठी
प्रार्थना करते....

स्वाती मेहेंदळे

# --- सावळी ---

जशी सावळी सांज, तशी सावळी नार,
रात दातावी तसा, दाट केशसंभार.

काळोखाच्या कुपीला, काजळाची कमान।
रुतते खोलवरी, नयनांची कट्यार.

कसे पालटे रुप, ही सरताच रात,
मूक कळ्यांना फूटे, वसंताचे धुमार.

नागमोडी वाटेला, नागमोडी हिंदोल,
काळीज कापणारे, हे यौवन उभार.

सोनसळी उन्हात, झळाले कात कृष्ण,
सावळ्या केशवाचा, हा सावळा प्रभार.

अभिषेक सामंत

# --- तिचं व्याकरण ---

एखाद्या सुंदर अक्षरासारखं
घडवलयं तिला विधात्याने
उपमा, अलंकार, अनुप्रास, यमक हे काहीही नसलेली-
एखादी साधी कविता
मनाला भिडावी, तशी ती भिडते

स्वल्पविरामासारखी एकामागून एक
सतत काहीतरी बोलत रहायची तिला सवय
न जाणे, कोण कवी तिला इतके शब्द देतो
तिचा शब्दन शब्द कानात घुमतो
मधेच कधीतरी अर्धविरामासारखं तिचं थांबणं
माझ्याकडे बघणं-पुसट हसणं
आणि शहारुन गेलेलं माझं जगणं

ती नसताना फक्त डोळे बंद करुन
तिला आठवलं ना की,
तिची सारी उदगारवाचक चिन्हे आठवतात
मग मी मनात हसलो की,
"अय्या, किती गोड!"
म्हणून तिचे शब्द क्षितीजामागून येतात

मी अबोल, शांत-
पण माझी नसलेली अक्षरं
वाचायची जादू आहे तिच्यात
माझ्या डायरीच्या रोजची पानही तिच लिहीते
इतकं मला ती आतून ओळखते

पण मी मात्र - अजूनही तिला
पूर्ण ओळखू शकलेलो नाही
ती इतकी बोलकी, व्यक्त
तरीही कायम प्रश्नचिन्हासारखी
उभी राहते माझ्यासमोर
तिचा नवा कोरा कागद घेऊन,
तिचीच नवी कोरी अक्षरं लिहायला
मीही वेडाच - बसतो तिच्याबरोबर
तिची नि माझी –
रोजची डायरी पूर्ण करायला

पुन्हा काही नवी अक्षरं
काही ओळखीची विरामचिन्ह
भरभरुन लिहिते ती – दोघांची पानं
संध्याकाळ झाली की मग, ती
लाल-जांभळया क्षितीजावर
एक काळ पूर्णविराम देते - अलगद
आणि मला देऊन जाते
दोघांच्याही डाय-या रात्रभर वाचायला

मग माझ्यापाशी –
हळहळ, तळमळ, तगमग रात्रभर
कूस बदलून बदलून कंटाळलेली उशी
तिने शेवटचा पूर्णविराम लावायची भिती
आणि.......अशीच एखादी नवी कविता
एवढच उरतं शेवटी

हृषिकेश चुरी

# --- बये ---

कोरडी ठणठणीत असायचिस पुर्वी,
एखादं शेवाळातलं डबकं सोडलं तर....
मग तुझ्या गर्भातल्या
तु गोंजारलेल्या
बाळबोध दगडी
माझ्या आज्यानं की त्याचाही पंज्यानं
दारात, घरात आणुन टाकल्या,
पाय-या ओटया बांधायल्या....
मी आजही तुडवतो... पायदळी..

मग आज्जी म्हणत्ये,
“बापजाद्याजी कमाई लेका,
तुम्ही फेकाल एखाद दिवस....
जिथून आली तिथं”

मग मीही मनाशी म्हणतो,
सा-या पिढ्या तुझ्या उदरात वाहून गेल्या,
कधी कोरड्या पात्रात,
कधी उधाण भरात....
त्या पिढ्यांचं देणं
म्हणून नाही ना
या दगडी माझ्या घरात??

मयूरेश चव्हाण

# --- मुक्त प्राक्तन ---

सरणावर भावनांना आज साठवून आलो,
नियतीला नियतीशी आज भेटवून आलो

जखमांवर आठवणींच्या फुंकर घातली अन,
रक्ताला आसवांच्या आज सुखवून आलो

विसरलीस प्रेमाची, तू साथ माझ्या जरीही,
स्पर्शाला तव प्रेमाच्या आज आठवून आलो

छळतात आठवणी ज्या, खास कातरवेळी,
परतीच्या प्रवासाला आज पाठवून आलो

दृष्ट लागली ऐसी सारिपाटाला सचिनच्या,
मयताला प्राक्तनाच्या आज पेटवून आलो

सचिन पावसकर
अतिथी संपादक
मुंबई

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास ‘नेटाक्षरी’ जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणा-या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय. आमच्या रसिक वाचकांच्या ह्याच उत्स्फुर्त प्रतिसादामुळे नेटाक्षरीने मागल्याच आठवड्यात नाबाद ७५चा पल्ला गाठला. नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ५०००० हून अधिक मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्या व्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करुन वाचणा-यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतु असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा. आपल्या सारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

---

## ई-साहित्य प्रतिष्ठानची इतर विनामूल्य ई-साप्ताहिके

ई-स्टाप, स्वरनेटाक्षरी ऑडियो अल्बम, बालनेटाक्षरी

## प्रसिद्ध झालेली ई-बुक्स

- टल्लीची शाळा
- मकरंदच्या त्रिवेण्या
- ग्रेव्हयार्ड लिटरेचर
- चार क्षण
- तो आणि ती
- प्रियेचे अभंग
- देशी दारुचे दुकान-3D
- ई-शाळा
- तो, मी आणि सिगरेट
- मोरया
- लोकल गोष्टी



वरील ई-बुक्स विनामूल्य मिळण्यासाठी तसेच
सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी संपर्क करा
**esahity@gmail.com**

**नेटाक्षरीचा** हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी
व सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी संपर्क करा
**netaksharee@gmail.com**